

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
मंत्रालय (मुख्य इमारत), दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्र ०२२ २२७९ ४२४० Email ID : home_special1a@maharashtra.gov.in

---

क्र.संकिर्ण-११२१/प्र.क्र.२३२/विशा-१अ दिनांक :- ३० नोव्हेंबर, २०२१.

**विषय :- ६ डिसेंबर, २०२१ रोजी भारतीय राज्यघटनेचे शिल्पकार परमपूज्य डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या ६५ व्या महापरिनिर्वाण दिनानिमित्त मार्गदर्शक सूचना.**

## परिपत्रक

मागील दोन वर्षापासून सुरु असलेल्या कोरोना विषाणूच्या संक्रमणाच्या पार्श्वभूमीवर गेल्या काही दिवसांमध्ये दक्षिण आफ्रिकेमध्ये "ओमिक्रॉन" ही नवीन विषाणू प्रजाती आढळून आल्यामुळे संसर्गाचा नवीन धोका निर्माण झाला आहे. या ओमिक्रॉन विषाणू प्रजातीचे संक्रमण सामान्य नागरिकांमध्ये / रहिवाशांमध्ये फार मोठ्या तीव्रतेने पसरण्याची दाट शक्यता आहे. या पार्श्वभूमीवर कोणत्याही प्रकारचे सामाजिक कार्यक्रम, जेथे जास्त गर्दी होण्याची शक्यता आहे असे कार्यक्रम टाळणे अपरिहार्य झालेले आहे.

वरील पार्श्वभूमीवर या संक्रमण रोगाचा प्रभाव पाहता, यावर्षी सुध्दा खबरदारीचा उपाय म्हणून दिनांक ६ डिसेंबर, २०२१ रोजी परमपूज्य डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या ६५ व्या महापरिनिर्वाण दिनानिमित्त चैत्यभूमी, दादर, मुंबई येथे आयोजित करण्यात आलेल्या कार्यक्रमाबाबत खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत :-

१. यावर्षी परमपूज्य डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचा दिनांक ०६ डिसेंबर, २०२१ रोजीचा महापरिनिर्वाण दिनाचा कार्यक्रम कोविड-१९ च्या पार्श्वभूमीवर आरोग्याच्या दृष्टीकोनातून पूर्ण खबरदारी घेवून साध्या पध्दतीने व लोकांनी एकत्रित न येता आयोजित करावयाचा आहे.

२. कोविड-१९ च्या संसर्गजन्य परिस्थितीचा विचार करता महाराष्ट्र शासन महसुल व वन, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभागाचे परिपत्रक क्रमांक परिपत्रक क्र.DMU/ २०२०/ CR.९२/ DisM-१/, दि.०४.०६.२०२१, सार्वजनिक आरोग्य विभागाचे आदेश क्र.कोरोना-२०२१/प्र.क्र.३६६/ आ-५, दि.११.०८.२०२१ तसेच आदेश क्र.कोरोना-२०२१/प्र.क्र.३६६/आ-५, दि.२४.०९.२०२१ अन्वये "ब्रेक द चेन" अंतर्गत दिलेल्या सुधारित मार्गदर्शक सूचनांचे तंतोतंत पालन करावे.

३. महापरिनिर्वाण दिन हा भारतीयांसाठी दु:खाचा, गांभीर्याने पालन करावयाचा असून परमपूज्य डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या विषयी कृतज्ञता व्यक्त करण्याचा दिवस आहे. त्यामुळे ओमिक्रॉन या कोरोना विषाणुच्या प्रजातीमुळे कोविड संसर्गाचा वाढलेल्या धोक्याचा विचार करता महापरिनिर्वाण दिनी सर्व अनुयायांनी काळजी घेणे व गांभीर्याने वागणे आवश्यक आहे. तसेच शासनातर्फे महापरिनिर्वाण दिनानिमित्त चैत्यभूमी, दादर, मुंबई येथील कार्यक्रमाचे दुरदर्शनवरुन थेट प्रक्षेपण करण्यात येणार असल्याने सर्व अनुयायांनी चैत्यभूमी, दादर, मुंबई येथे न येता घरी राहूनच परमपूज्य डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांना अभिवादन करावे.

४. चैत्यभूमी, दादर, मुंबई येथे परमपूज्य डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांना शासकीय मानवंदना देण्यासाठी मान्यवर उपस्थित रहाणार आहेत. सदर कार्यक्रमासाठी जे व्यक्ती परमपूज्य डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांना अभिवादन करण्यासाठी येतील त्यांचे कोविड प्रतिबंधक लसीचे दोन्ही डोस पुर्ण झालेले असणे बंधनकारक राहील. तसेच औष्णिक पटेक्षण (Thermal Screening) च्या तपासणीअंती ज्यांचे शरीराचे तापमान सर्वसाधारण असेल त्यांनाच सदर कार्यक्रमास उपस्थित रहाण्यासाठी परवानगी देण्यात येईल. कार्यक्रमाच्या ठिकाणी मास्कचा वापर, सॅनिटायझरचा वापर आणि सोशल डिस्टन्सींगचे पालन करावे, जेणेकरुन कोरोनाचा संसर्ग/संक्रमण वाढणार नाही.

५. दिनांक ०६ डिसेंबर, २०२१ रोजीच्या परमपूज्य डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या महापरिनिर्वाण दिनी चैत्यभूमी / शिवाजी पार्क मैदान परिसरात कोणत्याही प्रकारचे खाद्यपदार्थ/पुस्तके यांचे स्टॉल लावण्यात येवू नयेत. तसेच सदर परिसरात कोणत्याही प्रकारच्या सभा, धरणे, निदर्शने, आंदोलने व मोर्चे काढू नयेत.

६. महापरिनिर्वाण दिनानिमित्त परमपूज्य डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांना अभिवादन करण्याचा कार्यक्रम हा राज्यातील सर्व जिल्हे/तालुके यामध्येही आयोजित करण्यात येत असल्याने त्यासंदर्भात स्थानिक/ जिल्हा प्रशासनाने कोविड-१९ च्या स्थानिक परिस्थितीचा विचार करुन आवश्यक ते सनियंत्रण व उपाययोजना कराव्यात व त्यासंबंधीचे आदेश काढावेत.

७. कोविड-१९ व विशेषत्वाने ओमिक्रॉन या विषाणू प्रजातीचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी शासनाच्या नगर विकास विभाग, मदत व पुनर्वसन विभाग, आरोग्य, पर्यावरण, वैद्यकिय शिक्षण विभाग तसेच संबंधित महापालिका, पोलीस, स्थानिक प्रशासन यांनी वेळोवेळी विहित केलेल्या नियमांचे काटेकोर पालन सर्व नागरिकांनी करावे तसेच या परिपत्रकानंतर व प्रत्यक्ष महापरिनिर्वाण दिन अभिवादन सुरु होण्याच्या मधल्या कालावधीत शासन व स्थानिक प्रशासन स्तरावरुन आणखी काही सूचना नव्याने प्रसिध्द झाल्यास त्यांचे देखील अनुपालन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२१११३०११२१०२४९२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dagadu Khedekar

Digitally signed by Sanjay Dagadu Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a53701d2758331055dd3c46d615f8367912b1c64cd218e709c1b4de20bdf4f85, cn=Sanjay Dagadu Khedekar
Date: 2021.11.30 13:14:36 +05'30'

**(संजय खेडेकर)**
**उप सचिव, गृह विभाग.**

प्रत माहिती तथा आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधीपक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
८. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व मा. महापौर, महानगर पालिका
१२. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४.पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१६. सचिव व महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७.सर्व आयुक्त, महानगर पालिका
१८. सर्व पोलीस आयुक्त
१९. सर्व जिल्हाधिकारी
२०. सर्व पोलीस अधीक्षक
२१. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका
२२. निवडनस्ती.